# भाग्यवान माणूस



मराठी : अश्विनी बर्वे



अध्याय एक

# श्रीमंत भाऊ, गरीब भाऊ

एकदा दोन भाऊ होते.
त्यांचे शेत जवळजवळ होते.

मार्कोस श्रीमंत होता.
फेलिक्स गरीब होता.
फेलिक्स जेवढी अधिक मेहनत
करायचा तेवढा तो गरीब होत होता.



पण जसा जसा मार्कोस श्रीमंत झाला तो अधिकाधिक स्वार्थी होत गेला. एक दिवस तो म्हणाला, “मला माझं घर परत पाहिजे. मी त्यात डुक्करं ठेवेन.”



फेलिक्स एका पडक्या घरात राहत होता, जे जोराच्या वाऱ्याने हलत असे. आणि पावसात गळत असे. ते घर त्याला मार्कोसने दिले होते.

फेलिक्सने मार्कोसला कागदाचा एक तुकडा दाखवला. “या कागदानुसार हे घर माझं आहे.” तो म्हणाला. “यावर तुझी सही सुद्धा आहे.”



“या कागदाला काही अर्थ नाही,” मार्कोस ओरडला. “याबाबत इतर कोणाला माहित नाही. मी शहरात जाईन. हा कागद बघून जज हे घर मला राहण्यासाठी देतील.”



फेलिक्स घाबरला होता. कदाचित मार्कोसची गोष्ट खरी असेल. मग त्याच्या कुटुंबाला राहण्यासाठी कोणतीच जागा राहणार नाही.

मग त्याने जजला भेटण्याचा आणि त्याला कागद दाखवण्याचा निर्णय घेतला.



अध्याय दुसरा

# दोघांसाठी कांदे

फेलिक्सने आपल्या कुटुंबाला अच्छा म्हटले. त्याच्या बायकोने त्याला अन्न शिजवण्यासाठी एक भांडं आणि चार कांदे दिले. त्याच्याजवळ एवढंच राहिलं होतं.





शहरात पोहचण्यासाठी दोन दिवस लागत. पहिल्या दिवशी अंधार होईपर्यंत तो चालला. मग तो एका शेतकऱ्याच्या घरी गेला.

“मला थोडं पाणी मिळेल का?” त्याने शेतकऱ्याला विचारले. “आणि रात्री झोपण्यासाठी जागा?”





“तुला फक्त एक ग्लास पाणी मिळेल. आणि तू माझ्या कुत्र्याबरोबर झोपू शकतो,” शेतकरी म्हणाला.

फेलिक्सने फार्महाउसमध्ये पाय ठेवला. जेवणाचे टेबल विविध पदार्थांनी सजवलेले होते. तिथं शेतकऱ्याची बायको खाण्यासाठी बसली होती.





जेव्हा शेतकरी आणि त्याची बायको जेवत होते तेव्हा फेलिक्स आपले कांदे शिजवत होता. “व्वा! शेत्ऱ्याची बायको म्हणाली. “काय सुगंध येतोय. मला एक कांदा पाहिजे.”

फेलिक्सने त्यांच्या ताटात एक कांदा ठेवला. “मला भाजलेल्या मासाचा एक तुकडा मिळू शकतो का?” फेलिक्सने विचारले.



"लालची भिकारी!" शेतकऱ्याची बायको ओरडली. “आम्ही तुला पाणी आणि झोपण्यासाठी जागा दिली. पण तू तर अजून मागत आहेस. चल, अजून एक कांदा मला दे.”





फेलिक्सने शेतकऱ्याच्या बायकोच्या ताटात अजून एक कांदा ठेवला. तिने तो खाल्ला. तिने अजून एक मागितला. फेलिक्सने तिला तिसरा कांदापण दिला.

फेलिक्सने शेवटचा उरलेला कांदा खाल्ला. मग तो कुत्र्याच्या कुशीतच पाय मुडपून झोपला.





शेतकऱ्याने फेलिक्सला आपल्या घरातून हाकलून दिले. “मी शहरात जाईन आणि उच्च न्यायाधिशाला जावून सांगेन. ते नक्की तुला फाशीची शिक्षा देतील,” शेतकरी ओरडला.

रात्री फेलिक्सने एक मोठा आवाज ऐकला. “ओह, मी मरते आहे.”शेतकऱ्याची बायको रडत होती. “त्या भिकाऱ्याने मला कांद्यातून विष दिले.”



अध्याय तीन

# खेचराची शेपटी

फेलिक्स शहरात न्यायाधीशाला शोधायला गेला.त्यादिवशी त्याने शेतकरी आणि मार्कोसला घोड्यावरून जातांना पाहिलं.

फेलिक्सने एका माणसाला बघितलं.त्याचे खेचर चिखलात फसले होते. फेलिक्स खेच्रराच्या मागे गेला. “मी त्याची शेपटी फिरवतो, तू त्याला पुढून ओढ आणि मी मागून धक्का देतो.”
फेलिक्स त्या माणसाला म्हणाला.



"एक दोन तीन!" फेलिक्सने मोजलं. अरेरे!खेचर कोरड्या रस्त्यावर पडला. पण त्याची शेपटी फेलिक्सच्या हातात आली.





“बघ हे तू काय केलं?” माणूस ओरडला. “आता माझा खेचर काही कामाचा नाही.मी आता शहरात जाईन आणि न्यायाधीशाला सगळं सांगेन.”

तो माणूस धावू लागला. “तुला फाशीची शिक्षा होईल,” तो फेलिक्सवर ओरडला.





“ते मला केवळ एकदाच फाशी देवू शकतात.” फेलिक्स स्वतःलाच म्हणाला. “अर्थात एकच फाशी खूप होते.”

अध्याय 4

# शहरात

जेव्हा फेलिक्स शहरात आला,तेव्हा रात्र झाली होती. त्याच्याजवळ भाड्याने खोली घ्यायला पैसे नव्हते. म्हणून तो एका भिंतीवर चढून त्यावर झोपला.



पण फेलिक्स हे विसरून गेला की तो भिंतीवर झोपला आहे. तो आपल्या झोपेत वळला आणि पडला..
"वो ईईईईईईईईई!" म्हणून तो ओरडला. तो एका झोपलेल्या घोड्यावर जावून पडला.



घोडडयाने झोपलेल्या
कुत्र्याला लाथ
मारली.

कुत्रा झोपलेल्या
मांजराला चावला.





मांजराने एका झोपलेल्या
माणसाचे नाक
बोचकारले.

तो माणूस जोरात ओरडला.
त्याने आपल्या पायाने भिंतीला
जोरात लाथ मारली.





फेलिक्सने आपले खांदे उडवले. “ते मला केवळ एकदाच फासावर लटकवू शकतात. तसे तर एक फाशीच खूप होते,“ तो म्हणाला.



मग त्या माणसाने आपल्या नाकाची आणि पंज्याची जखम बघितली आणि, “तू तर मला जवळजवळ मारूनच टाकलं.” तो फेलिक्सवर ओरडला. “मी ही गोष्ट न्यायाधीशाला जावून सांगेन.”

अध्याय पाचवा

# न्यायाधीश

दुसऱ्या दिवशी मार्कोस न्यायालयात आधी बोलला.

त्यानंतर फेलिक्सने न्यायाधीशाला मार्कोसच्या दस्तऐवजाचा तुकडा दाखवला.
न्यायाधीशाने निर्णय दिला , "घर, फेलिक्सचे आहे.”

न्यायाधीशाने फेलिक्सला त्रास दिल्याबद्दल मार्कोसने त्याला १००० सोन्याची नाणी द्यायला सांगितले.





जेव्हा शेतकऱ्याने आपली कहाणी संपवली, तेव्हा न्यायाधीशाने त्याला विचारले, “तुझ्या बायकोचा मृत्यू झाला का?” शेतकरी म्हणाला, “मी इकडे येण्याच्या घाईत होतो त्यामुळे मला माहित नाही.”



फेलिक्सने वाकून न्यायाधीशाचे आभार मानले. न्यायाधीशाशी बोलण्यासाठी अजून तीन माणसं शिल्लक होती. पण आता फेलिक्सच्या कुटुंबाकडे घर आणि खाण्यासाठी पैसे होते.



न्यायाधीशाने फेलिक्सला त्रास दिला म्हणून त्याला ५०० सोन्याची नाणी द्यायला सांगितले.



न्यायाधीशाच्या चेहऱ्यावर एक स्मित होते. "तुझी लालची पत्नी मेली नाही. पण आता ती परत खूप कांदे खाणार नाही."

पण दोन माणसं अजून न्यायाधीशाशी बोलण्यासाठी थांबले होते. खेचरवाल्या माणसाने त्याची कहाणी सांगितली.






न्यायाधीशाला हसू आले. "फेलिक्सने खेचराला जखमी केले आणि त्याला त्याची शिक्षा झाली पाहिजे.” न्यायाधीश म्हणाले, “फेलिक्स त्या खेचराला शेपटी येईपर्यंत त्याच्याबरोबर ठेवेल.”

“पण सर!” माणूस म्हणाला.
“त्या खेचराची शेपटी परत
कधी वाढणार नाही.”






न्यायाधीश हसले. “ओह?असं
आहे तर? मग फेलिक्स साठी
ही शिक्षा बरोबर आहे. मग
त्याला जीवनभर खेचराची
देखभाल करावी लागेल.”



फेलिक्सने वाकून न्यायाधीशाला नमस्कार केला. आता त्याच्या कुटुंबाजवळ एक घर, १७५० सोन्याची नाणी आणि प्रवासासाठी एक खेचर होते.



फेलिक्सला त्रास दिल्याबद्दल त्या माणसाने २५० सोन्याची नाणी द्यावी असे न्यायाधीशाने सांगितले..

पण बोचकारलेले नाक आणि
पंज्याला जखम झालेला
माणूस अजून चिडलेला होता
आणि ओरडत होता.





न्यायाधीश म्हणाले की या
माणसाची कहाणी सगळ्यात
दुःखदायक आहे. “या माणसाला
न्याय मिळायला पाहिजे.”
न्यायाधीश म्हणाले.

“त्या माणसाने भिंतीवर उभं राहायला पाहिजे, मग त्या घोड्यावर उडी मारायला पाहिजे..





मग घोडा कुत्र्याला लाथ मारेल.



मग कुत्रा मांजराला चावेल.



मग मांजर फेलिक्सला बोचकारेल.

आणि  फेलिक्स भिंतीवर लाथ मारेल."





तो माणूस आपल्या एका चांगल्या पायाने  उड्या मारू लागला. त्याचे नाक अजून लाल झाले.

“पण भिंत पडली तर मी मरून जाईन. मी फेलिक्स सारखा नाही. फेलिक्स एक भाग्यवान माणूस आहे.





न्यायाधीश म्हणाले, “जर तू उडी मारली नाही तर तुला फेलिक्सला ५० सोन्याची नाणी नुकसानभरपाई म्हणून द्यावी लागतील.”

मग फेलिक्स आपल्या खेचरावर बसून घराकडे निघाला.नान्यामुळे त्याचा खिसा खुळखुळत होता.

आणि त्या माणसाचे शब्द त्याच्या कानात घुमत होते.फेलिक्स खरोखरच एक भाग्यवान माणूस होता.



समाप्त